

# नटखट अस्वल

सत्य घटनेवर आधारित

लेखक: जॉन सँडीन

मराठी: तृप्ती कर्णिक



# नटखट अस्वल

## सत्य घटनेवर आधारित

लेखक: जॉन सँडीन

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक





जंगलात भटकत असताना ॲन्ड्र्यूला एक अस्वलाचं पिल्लू दिसलं. आई दिसत नव्हती म्हणून ते बिचारं रडत होतं. आईला काय झालं हे त्या पिल्लाला जरी माहित नसलं तरी ॲन्ड्र्यूला माहित होतं. त्याने मगाशीच बंदुकीचा बार ऐकला होता.

एका अस्वल आईला गोळ्या झाडणारा माणूस किती दुष्ट प्रवृत्तीचा असेल असा विचार त्याचा मनात आला.

ॲन्ड्र्यूने त्या अनाथ पिल्लाला कडेवर घेतलं. आणि तो त्याला घरी घेऊन आला.

“अरे देवा! आता ह्या अस्वलाच्या पिल्लाचं काय करायचं? आईने विचारलं.

“मी त्याची काळजी घेईन,” ॲन्ड्र्यू म्हणाला.

“त्याला मी खाऊपिऊ घालेन आणि छान गंमती-जमती शिकवीन.”



“गंमती-जमती?” आई म्हणाली.

“असं काही असतं का?”

पण पिल्लाला घरात ठेऊ नको असं ती ॲन्ड्र्यूला म्हणू शकली नाही.

त्यामुळे ॲन्ड्र्यूने पिल्लूला घरातच ठेवलं.



ॲन्ड्र्यूने प्रेमाने त्याचं नाव बेअरली ठेवलं.

त्याने बेअरलीला कोमट दुध पाजलं आणि मधात घोळवलेला मक्याचा ब्रेड भरवला.

शेकोटीजवळ त्याच्यासाठी मऊ गादी घातली.

छोटू अस्वल लाडाने ॲन्ड्र्यूच्या नाकाला आपलं नाक घासायचा आणि आवाज काढायचा.



छोटा बेअरली सगळीकडे ॲन्ड्र्यूच्या मागेमागे फिरायचा.



ॲन्ड्र्यूने बेअरलीला मागच्या पायांवर उभं राहायला शिकवलं. लवकरच बेअरली नाचायलाही शिकला.






तिथून तीस मैलावर राहत असलेल्या जॉन लॅसी नावाच्या फोटोग्राफरच्या कानावर ह्या नाचणाऱ्या अस्वलाची बातमी आली.

"कसला भारी फोटो येईल ह्या भालूचा!" जॉन म्हणाला.

जॉन लॅसीने कॅमेरा पाठीशी बांधला आणि तो एरविन फार्मच्या दिशेने निघाला.



हॅटीने दार उघडले.

“गोड मुली,” जॉन म्हणाला.

“मी तुमच्याकडच्या नाचणाऱ्या अस्वलाला भेटायला आलो आहे.”



“हो, बेअरली खरंच छान नाचतो,” ती कौतुकाने म्हणाली.

“हॅटी, कुणाशी बोलते आहेस?” आईने दारातून डोकावून विचारलं.

“मी जॉन लॅसी. कॅमेरा घेऊन आलो आहे. मी तुमच्याकडच्या नाचणाऱ्या अस्वलाचा फोटो काढला तर चालेल का?”

मिसेस एरविनची त्याच्या काळ्या खोक्याकडे नजर गेली.

तिने ह्याआधी कधीच कॅमेरा पाहिला नव्हता.

“बाकीचे काय म्हणतील?” तिला प्रश्न पडला.

“चालेल मि. लॅसी. तुम्ही आत या ना. मी हॅटीला पाठवते तिच्या भावाला शोधून आणायला.”

त्या अनोळखी माणसाचं निरीक्षण करत ॲन्ड्र्यू दारातच उभा राहिला.

“इकडे ये बाळा,” जॉन लॅसीने त्याला बोलावलं.

“मी इथे का आलोय हे तुला माहित आहे का?”

“हो, हॅटीने सांगितलं मला,” ॲन्ड्र्यू म्हणाला.

“तो काळा खोका म्हणजे कॅमेरा आहे का?”

“हो, अगदी बरोबर,” जॉन लॅसी म्हणाला.



“फोटो काढताना बेअरलीला काही इजा होणार नाही ना?” ॲन्ड्र्यूने काळजीने विचारलं.

“अजिबात नाही,” जॉन लॅसी हसून म्हणाला.

ॲन्ड्र्यू बेअरलीला शोधायला घराबाहेर पडला.

“बेअरलीSSS!” तो जोरजोरात हाका मारू लागला. परंतु बेअरली कुठे दिसेना.



ॲन्ड्र्यूने त्याला धान्याच्या कोठारात शोधलं.

बेअरलीला गवतात झोपायला आवडायचं म्हणून तिकडे पाहिलं पण तो तिथेही नव्हता.

तेवढ्यात जेम्स आणि हर्मन त्याला तळघरात जाताना भेटले.

“तुम्ही बेअरलीला कुठे बघितलं का?” ॲन्ड्र्यूने विचारलं.

त्याने त्यांना जॉनबद्दल सांगितलं.

“काय? फोटोग्राफर?” दोघेही ओरडले.

“चल, आपण मिळून बेअरलीला शोधूयात.”



“तो नेहमी स्वयंपाकघराच्या धुरांड्याच्या आसपास वास घेत फिरत असतो,” जेम्स म्हणाला.

“चला, आपण त्याला तिकडे शोधूयात.”

तिथे काही सॉसेजस आणि हॅम पडलेले दिसले परंतु बेअरली मात्र नव्हता.



“मुंग्या आणि मध शोधत तो जंगलात फिरत असतो. चला आपण त्याला तिकडे शोधूयात,” अॅन्ड्र्यू म्हणाला.



जंगलात त्यांना मस्त पिकलेल्या गोड तुती मिळाल्या परंतु बेअरलीचा काही पत्ता लागला नाही.

“कदाचित तो मासे पकडायला गेला असेल,” हर्मन म्हणाला.

त्यांनी तळ्याच्या आसपास खूप शोधलं पण बेअरली काही सापडला नाही.

जेनी आणि सारा त्याच्या स्कर्टला सजवण्यासाठी वेल गोळा करत होत्या. रविवारच्या चर्चच्या प्रार्थनेसाठी त्यांना ते सुंदर स्कर्ट लागणार होते.





मुलीनी आऊट हॉऊसमध्ये शोधलं.

लाकडाच्या ढिगाजवळ पाहिलं.

कोंबडीच्या खुराड्यात लपलाय का बघितलं.

त्यांना अंडी मिळाली पण बेअरली काही सापडला नाही.



ॲन्ड्र्यूने त्यांना फोटोग्राफर जॉनबद्दल सांगितलं.

“कसलं भारी!” दोघीही हुरळून गेल्या.

“चल, आम्ही पण तुला बेअरली शोधायला मदत करतो.”

“मला कळत नाही की ॲन्ड्र्यूला इतका का वेळ लागतोय,” मिसेस एरविन म्हणाल्या.



त्यांनी ओव्हनमधून गरम पॅन बाहेर काढला.

“मि. लॅसी, तुम्हाला आज आमच्यासोबत जेवायला आवडेल का?” त्यांनी विचारले.

गरमगरम मक्याच्या ब्रेडचा वास इतका मस्त येत होता की लॅसीने ताबडतोब होकार दिला.

ॲन्ड्र्यूने आपल्या ताटात भरपूर तुती वाढून घेतल्या.

तसेच ताटातल्या चिकन आणि बटाट्यावर मस्त गरम दाट रस्सा ओतला.

आईने आज अतिशय चविष्ट जेवण केल्यामुळे तो एकदम खुश झाला.



जॉन लॅसी हनुवटीला लागलेला रस्सा पुसत म्हणाला,

“आजच्या रुचकर जेवणाबद्दल मी तुमचा खूप आभारी आहे, मिसेस एरविन.

मला बेअरलीला भेटता आले नाही त्याबद्दल मात्र वाईट वाटतंय.”

ॲन्ड्र्यूने खाली प्लेटकडे नजर झुकवली.

आता आपल्याला कधीही रडू कोसळेल. आणि मि. लॅसीनी आपल्याला रडताना पाहू नये अशी त्याची इच्छा होती.

“माझी एक विनंती आहे,” लॅसी म्हणाला.

“इथे मी निव्वळ एका फोटोसाठी खूप लांबचा प्रवास करून आलो आहे. तुम्हा कुटुंबियांचा एकत्र फोटो काढला तर चालेल का?”



"ओह!" जेनी आणि सारा ओरडल्या.

“हो म्हण ना!" जेम्स आणि हर्मनची विनंती केली.

“प्लीज!” हॅटी म्हणाली.

मि. एरविनने आपल्या बायकोकडे पाहिलं.

“मस्त कल्पना आहे,” मिसेस एरविन म्हणाल्या.

“पण रोजच्या कपड्यात नाही हं.”

“अर्थातच नाही!” जेनी-सारा म्हणाल्या.

जॉन लॅसीनी बाहेर नजर टाकली.

लवकरच दिवस मावळणार होता.

“किती वेळात तुम्ही आटपू शकाल?” त्याने विचारलं.

“अगदी काही मिनिटात!” जेनी उत्तरली.





आणि मग असला गोंधळ उडाला!!!



रविवारी सकाळी चर्चला जायला जसे सगळे नटून तयार होतं तसं सगळं चालू होतं.

मिसेस एरविन जेनीचे केस विंचरत होत्या, जेनी साराचे आणि सारा हॅटीचे!

बरं झालं आपल्याकडे सुंदर घेर असेलेले स्कर्ट आहेत," जेनी म्हणाली.

"पायघोळ स्कर्टसकट आपला संपूर्ण फोटो घेतला तर काय मजा येईल!"

"हाय हाय! मला तर वेड लागेल," सारा हसत म्हणाली.





ॲन्ड्र्यूने त्याचा रविवारचा स्पेशल सूट घातला.

त्याने त्याचे नवे कोरे लेदर शूज चढवले.

ते थोडे पायांना टोचायचे.

पण ते काही जुने वापरलेले बूट नव्हते त्यामुळे ॲन्ड्र्यूला ते खूप आवडायचे.

“आता बेअरली असायला हवा होता,” त्याच्या आठवणीने ॲन्ड्र्यूला उदास वाटले.

त्याने बेअरलीला पुन्हा खूप हाका मारल्या पण तो काही आला नाही.



जॉन लॅसीने कॅमेरा सेट केला.

“थोड्या खुर्च्या आणा,” त्याने सांगितलं.

“पटापट चला, लवकरच अंधार होईल.”

मि. एरविन खुर्चीत बसले.

त्यांनीही रविवारचा सूट घातला होता.

मिसेस एरविन त्यांच्या शेजारच्या खुर्चीत बसल्या.

त्यांनी लग्नातील गाऊन घातला होता.

हॅटी आईच्या मांडीवर चढून बसली.

इतरांनी कुठे आणि कसं उभं राहायचं ह्याची सूचना जॉन लॅसीनी दिली.

मग जॉननी डोके काळ्या कापडाखाली घातलनं.

“सगळे छान दिसताहेत,” तो म्हणाला.

“सगळ्यांनी अगदी शांत बसायचं आहे. जो कुणी हलेल त्याचा फोटो अस्पष्ट येईल.”



त्याने कॅमेरात प्लेट घातली आणि लेन्सवरचे कव्हर काढले.

त्याने त्याच्या पॉकेट घड्याळाकडे पाहिलं.





ॲन्ड्र्यूच्या नाकाला खरंतर खूप खाज येत होती. पण त्याने अजिबात खाजवलं नाही. त्याला त्याचा फोटो स्पष्टच हवा होता.

एकदाचं जॉन लॅसीनी सांगितलं,

“ठीक आहे, तुम्ही आता उठू शकता.”

हॅटीने आईच्या मांडीवरून उडी मारली.

ॲन्ड्र्यूने नाक खाजवून घेतलं.

मि. लॅसीनी कॅमेरातून प्लेट काढली आणि काळजीपूर्वक त्याला पेपरमध्ये गुंडाळून आणि पिशवीमध्ये नीट ठवली.

“आम्हाला फोटो पाहायला मिळेल का,” हॅटीने उत्सुकतेने विचारलं.

“लगेच नाही,” तो म्हणाला.

“ही प्लेट मला आधी डेव्हलप करायला लागेल. पुढच्या वेळी ह्या भागात येताना मी फोटो घेऊन येईन.”





जॉन लॅसी दिसेनासा होईपर्यंत सगळेजण त्याच्याकडे पाहत होते.

“मी मोठा झालो की फोटोग्राफरच होईन,” हर्मन म्हणाला.

“मी पण,” ॲन्ड्र्यूने त्याला दुजोरा दिला.

“मी फोटोग्राफर आणि अस्वलांचा ट्रेनर होईन,”

तेवढ्यात फांदी तुटण्याचा आवाज आला म्हणून त्याने वर पाहिले.



बेअरली झाडावरून खाली उतरला.

त्याने ॲन्ड्र्यूभोवती गोलाकार नाच केला. त्याने ॲन्ड्र्यूला चाटलं.

“आता तुझी हुशारी दाखवतोस काय?” ॲन्ड्र्यू रागावत म्हणाला.

कुणीतरी तपकिरी रंगाचा भरपूर केस असलेला प्राणी त्याच्याकडे पाहत होता.

त्याला त्याच्या डोळ्यावर विश्वासच बसेना.

“बेअरली!” तो ओरडला.

“बदमाश कुठला! चल आधी खाली उतर!”





पण तो काही खरंखुरं रागावला नव्हता.

बेअरलीही ते ओळखून होता.



ॲन्ड्र्यू जॉन लॅसीची रोज वाट पहायचा.

पण तो येत असताना पहिल्यांदा हॅटीला दिसला.

“तो बघा येतोय,” ती जोराने ओरडली.

“त्याला नक्की मक्याचा ब्रेड भाजल्याचा वास आला असेल,” मिसेस एरविन हसून म्हणाल्या.



जॉन लॅसीने घोड्यावरून खाली उडी मारली.

“मी तुम्हा सर्वांसाठी एक सरप्राईज आणले आहे,” जॉन म्हणाला.

त्याने एक सपाट पाकीट बाहेर काढले.

“सरप्राईज कसलं त्यात,” हॅटी म्हणाली.

“त्यात आमचा फॅमिली फोटोच असणार आहे.”

“अगदी बरोबर,” जॉन लॅसी म्हणाला. “पण त्यात आणखीन एक गंमत आहे!”

सगळेजण मि. लॅसी उघडत असलेल्या पाकिटाकडे उत्सुकतेने पाहू लागले.

“अरे व्वा! आपला फोटो किती सुंदर आला आहे! सगळे स्पष्ट आलेत,” ॲन्ड्र्यू म्हणाला.

“पण ही मी नाही हं,” हॅटी म्हणाली.

“इतकी काही छोटी नाही मी.”

“आहा! आमचे सुंदर स्कर्ट पाहिले का!” आनंदाने जेनी-सारा किंचाळल्या.

“अय्या! आपलं घर किती सुंदर दिसतंय!” मिसेस एरविन म्हणाल्या.

ते ऐकून मि. एरविननी आनंदी स्मितहास्य केले.

त्यांनी ते घर खूप वर्षांपूर्वी स्वत: बांधलं होतं.

“पण ते केसाळ असं काय दिसतंय?” हॅटीने विचारलं.

“ते वर..वर त्या झाडावर.”



सगळेजण जवळ येऊन पाहू लागले.

फोटोत झाडावर काहीतरी दिसत होतं.

काहीतरी केसाळ..झुपकेदार...

आणि तपकिरी...



आता मात्र लॅसीला हसू आवरलं नाही.

“मी म्हणालो होतो ना एक सरप्राईज आहे म्हणून.” लॅसी म्हणाला.




“अरे, हा तर बेअरली!” ॲन्ड्र्यू आनंदाने ओरडला.

“हा बदमाश शेवटी आलाच फोटोमध्ये!”